मुख्य अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या / पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-१३२३/प्र.क्र. ४४/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १५ फेब्रुवारी, २०२३

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील श्री. राजीव ताराचंद गायकवाड, मुख्य अभियंता यांना शासन आदेश दि. ३०.१२.२०२२ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे या ठिकाणी पदस्थापना देण्यात आली होती. सदर पदस्थापनेत सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या कारणास्तव बदल करुन त्यांची पदस्थापना, महाव्यवस्थापक (स्थापत्य), मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मुंबई या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. गायकवाड यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. श्री. गायकवाड यांनी म. ना. से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहिल, अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. गायकवाड यांनी कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser१.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

४. श्री. गायकवाड यांची यापुर्वीची बदली त्यांच्या विनंतीनुसार करण्यात आली असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहणार नाही.

५. श्री. गायकवाड यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर पदस्थापना देण्यात आली असून, सदर पदस्थापना ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६. श्री. गायकवाड यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२१५१५५४५४१६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANGADHAR MAHAJAN GAIKWAD

Digitally signed by GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5EEEAD19A0EF3D2434AFCCB36079E80E7EDE5A45017EC3297470E90AE602404B, cn=GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
Date: 2023.02.15 15:58:31 +05'30'

**( गंगाधर म. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (नवि-१/नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मुंबई,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/नांदेड/ अमरावती/ नागपूर /राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
७. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे,
८. मुख्य अभियंता (विद्युत), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
११. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
१२. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४. श्री. राजीव ता. गायकवाड, मुख्य अभियंता, द्वारा- मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१८. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. सार्वजनिक बांधकाम विभाग / प्रशा-२, आस्था-१, आस्था- २, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.